**प्रभादेवी मुंबई येथील रविंद्र नाट्यमंदिर इमारतीच्या पहिल्या मजल्यावरील प्रस्तावित प्रशासकीय ब्लॉकच्या केबीन ॲन्टी चेंबर, लिफ्ट लॉबी व पी.ए. केबीनची दुरुस्ती अद्ययावत पध्दतीने नुतनीकरण व फर्निचर पुरवठा इत्यादी कामे करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. पुलदे २०२५/प्र.क्र.७९ (E-११४२५२१)/सां.का.२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०२ जून, २०२५

संदर्भ :- १. संचालक, पु.ल. देशपांडे, महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांचे पत्र क्र.जा.क्र. पुलदे/आस्था/२०२५/सार्वजनिक बांधकाम विभाग/६२४, दिनांक २७.०५.२०२५.
२. मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे पत्र क्र. मुअ(मुं)/का-३/२०१३/२०२५, दि. २३ मे २०२५.

**प्रस्तावना :**

संदर्भीय पत्र क्र. २ अन्वये मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, फोर्ट, मुंबई-०१ यांचेकडून रविंद्र नाटय मंदीर इमारतीच्या पहिल्या मजल्यावर असणाऱ्या प्रशासकीय ब्लॉक कार्यालयातील ॲन्टी चेंबर्स, लिफ्ट लॉबी, प्रसाधनगृह, पी.ए. केबीन येथील दरवाजे, खिडक्या, गिलावा, रंगकाम, गळती व वाळवी प्रतिबंधक प्रक्रिया, लादीकरण, जल व मल: निस्सारण वाहिन्या, आभासी छत व वॉल पॅनलिंग व इतर अनुषंगिक दुरूस्ती तसेच अंतर्गत विद्युतीकरण व नुतनीकरणाच्या कामासाठी लागणाऱ्ा खर्च रु.४,३७,७६,४४९/- (चार कोटी सदतीस लाख श्याहत्तर हजार चारशे एकोणपन्नास रु. फक्त) इतक्या रकमेसाठी पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांच्याकडे प्रस्ताव सादर केला आहे.

०२. या कामाच्या अंदाजपत्रकामध्ये स्थापत्य/विद्युत कामे व इतर अनुषंगिक दुरुस्ती प्रस्तावित केली असून, इतर (१८% जी.एस.टी.खर्च, १% कामगार विमा, ४ % आकस्मित निधी, ५ % सेंटेज चार्जेस व २.५ % आर्किटेक्ट व पीएमसी चार्जेस इ.) चा समावेश केला आहे. अंदाजपत्रकातील दर हे सन २०२२-२३ च्या राज्य दरसूचीतील दरांवर तसेच मंडळ कार्यालयाने मंजूर केलेल्या दरांवर आधारित आहेत, असे संदर्भीय पत्र क्र. २ मध्ये मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, यांच्या प्रस्तावात नमूद करण्यात आले आहे.

०३. संदर्भीय पत्र क्र.१ अन्वये संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांनी शासनास सदर प्रस्तावास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची विनंती केली होती. या अनुषंगाने प्रभादेवी, मुंबई येथील रविंद्र नाट्यमंदिर इमारतीच्या पहिल्या मजल्यावर असणाऱ्या प्रशासकीय ब्लॉक कार्यालयातील ॲन्टी चेंबर्स, लिफ्ट लॉबी, प्रसाधनगृह, पी.ए. केबीन येथील दरवाजे, खिडक्या, गिलावा, रंगकाम, गळती व वाळवी प्रतिबंधक प्रक्रिया, लादीकरण, जल व मल: निस्सारण वाहिन्या, आभासी छत व वॉल पॅनलिंग व इतर अनुषंगिक दुरूस्ती तसेच अंतर्गत विद्युतीकरण व नुतनीकरणाच्या कामासाठी लागणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

मुंबई येथील रविंद्र नाट्यमंदिर इमारतीच्या पहिल्या मजल्यावर असणाऱ्या प्रशासकीय ब्लॉक कार्यालयातील ॲन्टी चेंबर्स, लिफ्ट लॉबी, प्रसाधनगृह, पी.ए. केबीन येथील दरवाजे, खिडक्या, गिलावा, रंगकाम, गळती व वाळवी प्रतिबंधक प्रक्रिया, लादीकरण, जल व मल: निस्सारण वाहिन्या, आभासी छत व वॉल पॅनलिंग व इतर अनुषंगिक दुरूस्ती तसेच अंतर्गत विद्युतीकरण व नुतनीकरणाच्या कामासाठी लागणारा खर्च रु.४,३७,७६,४४९/- (चार कोटी सदतीस लाख श्याहत्तर हजार चारशे एकोणपन्नास रु. फक्त) इतक्या रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा खर्च मागणी क्र. “मागणी क्र.झेडडी-०२, २२०५ कला व संस्कृती (००) (०१) ललित कला शिक्षण (०७) कला अकादमी (०७) (०१) पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई (अनिवार्य) (२२०५ १४६३) २७-लहान-बांधकाम” या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. यासाठी संचालक, पु.ल. देशपांडे, महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिका-यास या संबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

०४. सदर कार्यक्रमासाठी होणाऱ्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांनी शासनास एक महिन्याच्या आत सादर करावे.

०५. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४, परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२५०६०२१३०६१९३७२३** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PARSRAM NANDRAM BAHURE

Digitally signed by PARSRAM NANDRAM BAHURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=ef62741544bc4d8832eecfb2b7ea295e8a6fcdfe9faffcfda201c87e1c73881b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5FD2A6873F4AE5B1D9EA7DD52E449E02A942EA90145BAEAB72C63CED6D659844, cn=PARSRAM NANDRAM BAHURE
Date: 2025.06.02 13:07:19 +05'30'

**( परसराम बहुरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय्य सहायक, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय्य सहायक, मंत्रालय, मुंबई
३. महालेखापाल, लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई
४. संचालक, पु.ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई
५. लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
७. उप सचिव (अर्थसंकल्प शाखा), पर्यटन व सांस्कृतिक विभाग, मंत्रालय, मुंबई
८. अवर सचिव (रोख शाखा), पर्यटन व सांस्कृतिक विभाग, मंत्रालय, मुंबई
९. निवडनस्ती/सां.का.२